जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना - निधी वितरीत करणेबाबत-लेखाशिर्ष ५ जिल्हे (२२०४ ५६८२).

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-३०२४/प्र.क्र.४२/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाधो-३११३/(प्र.क्र.५५/१३)/ क्रीयुसे-३, दिनांक २२ मे, २०१४.

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाधो-३०२४/(प्र.क्र.२४/२४) क्रीयुसे-१, दिनांक ९ फेब्रुवारी २०१४.

३) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.शिक्रीपी/तरतूद/क्रीप्रकें/निवि/ २०२३-२४/का-१३/१७१५, दिनांक १३ मार्च २०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य रहावे, नागरिकांमध्ये व्यायामाची आवड जोपासावी, राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, खेळाच्या दर्जात सुधारणा, खेळाडूंना गौरव, दर्जेदार क्रीडा सुविधा या बाबी केंद्रबिंदू मानून खेळाडूंसाठी हितावह योजना राज्यात राबविण्यासाठी क्रीडा धोरण २०१२ तयार करण्यात आलेले आहे. त्याची अंमलबजावणी करण्याबाबत दिनांक २२.०५.२०१४ अन्वये धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यातील शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील क्रीडापटूंच्या गुणांना वाव मिळण्यासाठी प्रत्येक जिल्हयात प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे.

सदर योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र.ई-३, प्रधान लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना, (१०)(०३), जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली सुधारित अदांजपत्रकानुसार ३१५.०० लक्ष तरतूदीतून निधी खर्चासाठी उपलब्ध आहे. त्यानुसार वितरणासाठी उपलब्ध तरतूदीमधून ५ जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांना क्रीडा संचालनालयाचे संदर्भ क्र.३ अन्वये केलेल्या विनंतीनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मागणी क्र.ई-३, प्रधान लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना, (१०)(०३), जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४

५६८२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी सुधारित अंदाजानुसार अर्थसंकल्पीत तरतूदीमधून खालील परिशिष्ट-अ मधील ०५ जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांना त्यांच्या नावासामोर दर्शविण्यात आल्यानुसार एकूण रु.२५१६०००/- इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | विभागाचे नाव | जिल्हा | रक्कम रु. |
|---|---|---|---|
| १ | नागपूर | वर्धा | ४,३३,५०० |
| २ | | गोंदिया | ४,०४,५०० |
| ३ | अमरावती | अमरावती | ६,९१,००० |
| ४ | | वाशिम | ४,७३,५०० |
| ५ | | बुलढाणा | ५,१३,५०० |
| | | एकूण - | २५,१६,०००/- |
| | | (अक्षरी रु.पंचवीस लक्ष, सोळा हजार फक्त) | |

२. उपरोक्त नमूद जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राना पुढील अटींच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा. तसेच, वितरीत निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

III. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (१०) (०३) जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), अंतर्गत ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक १२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी/उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१८४/१४७१, दि.२२/३/२०२४ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.४७५/व्यय-५, दि.२८/३/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८२००८४७३५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.28 20:18:26 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई
७) सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
९) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
१०) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव,
११) मा.मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव,
१२) मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
१३) अपर मुख्य सचिव (वित्त/क्रीडा-अ.का) यांचे स्वीय सहाय्यक,
१४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१५) संबंधित उपसंचालक,( क्रीडा संचालनायामार्फत्)
१६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनायामार्फत्)
१७) संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी,( क्रीडा संचालनायामार्फत्)
१८) कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) निवड नस्ती (क्रीयुसे-१).